केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत सन २०२४-२५ करिता सर्वसाधारण योजनेतून २२१०F१५७ या लेखाशिर्षातून ६०% केंद्र हिश्श्याचे रु.३३२९०.०० लक्ष व २२१०५२४६ या लेखाशिर्षातून ४० % राज्य हिश्श्याकरिता रु.२२१९३.३३ लक्ष इतके राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बियुडी -१३२४/प्र.क्र.२२०/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत

नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : ६ मे, २०२४

**वाचा :-**

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली यांचे मंजूरी आदेश दिनांक ०२/०५/२०२४.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१. ०४. २०२३.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दिनांक ०५. १२. २०२३.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०८.१२. २०२३.

५) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोम/एफएमजी/कें. रा. हि/७४३३-३९/२०२४-२५ दिनांक ०३/०५/२०२४.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाहय, परवडयाजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive child Health), नियमित लसीकरण, मिशन प्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलिओ लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी केंद्र व राज्य शासनाचा प्राप्त झालेला निधी सन २०२४-२५ च्या मुळ अर्थसंकल्पीत तरतुदीतून पुढील प्रमाणे वितरीत केलेला आहे त्याबाबतचे विवरण पत्र पुढीलप्रमाणे आहे.

**(रु. लाखात)**

| अ. क्र | तपशील | केंद्र | राज्य |
|---|---|---|---|
| | | २२१०F१५७ | २२१०५२४६ |
| १ | अर्थसंकल्पीय तरतुद (मुळ) | १०६९५४.३४ | ७००००.०० |
| A | एकुण तरतुद | १०६९५४.३४ | ७००००.०० |
| | वितरीत करावयाचा निधी | ३३२९०.०० | २२१९३.३३ |
| | शिल्लक तरतुद | ७३६६४.३४ | ४७८०६.६७ |

उपरोक्त विवरणपत्रात नमूद केल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियाना करीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी सर्वसाधारण (General) वर्गवारी साठी उपलब्ध करुन दिलेल्या केंद्र हिस्सा २२१०F१५७ या लेखाशिर्षातंर्गत रु.३३२९०.००लक्ष तसेच सदर रक्कमेच्या समरुप राज्य हिश्श्यापोटी २२१०५२४६ या लेखाशिर्षातंर्गत सर्वसाधारण वर्गवारीतुन ४० टक्के राज्य हिश्श्याचा रु.२२१९३.३३ लक्ष इतका निधी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजातील तरतुदीतुन राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्यासाठी लेखाशिर्ष २२१०F१५७ करिता रु.१०६९५४.३४ लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात करण्यात आली आहे. तसेच राज्य हिश्श्यासाठी लेखाशिर्ष २२१०५२४६ करीता रु.७००००.०० लक्ष इतकी तरतुद करण्यात आली आहे. सबब सदर तरतुदीतुन केंद्र हिश्श्यापोटी रु.३३२९०.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रू.२२१९३.३३ लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च केंद्र लेखाशिर्ष २२१०F१५७ व राज्य लेखाशिर्ष २२१०५२४६ अंतर्गत सन २०२४-२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

०३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य

सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटीच्या यांच्याकडे सूपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर प्रस्तावावरील खर्च खालील प्रमाणे नमुद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ साठी मंजुर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतुदीतुन भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | | | (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | सन २०२४-२५ ची अर्थसंकल्पीय तरतूद | मागणी रक्कम (केंद्र व राज्य) |
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ८०० इतर खर्च, सर्वसाधारण योजना (०१)(१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, केंद्र पुरस्कृत योजना, (६० टक्के केंद्र हिस्सा) (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०F१५७ | १०६९५४.३४ | ३३२९०.०० |
| २ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ८०० इतर खर्च, सर्वसाधारण योजना (०१)(१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, केंद्र पुरस्कृत योजना, (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०५२४६ | ७००००.०० | २२१९३.३३ |

०५. वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०१/०४/२०२४ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०६. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे राज्य आरोग्य सोसायटीने प्रमाणित केलेले आहे.

०७. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या/लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

०८. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०१ एप्रिल, २०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन करुन त्या संदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबीं स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहून निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरण करण्यात येत आहे.

०९. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व दिनांक १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तींचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात योणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

११. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भांत शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१२. सदर शासन निर्णय, केंद्र शासनाचे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून तसेच वित्त विभागाच्या दि.०८.१२.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०६१७३६०३५७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2024.05.07 10:01:36 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
११. निवडनस्ती ( आरोग्य -७) .